**राज्यातील न्यायिक अधिका-यांना Apple iPad Pro हे टॅबलेट्सच्या वार्षिक देखभाल करारासाठी रु.२,१७,७२,४१६/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संगणक- २०२३/प्र. क्र.१२/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२४.

**संदर्भ:**- १) समक्रमांकाचे शासन निर्णय दिनांक ०९.०३.२०२३.
२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/५३४/२०२३, दिनांक ०२.०१.२०२४.
३) विभागाच्या दिनांक १४.०२.२०२४ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायाधीशांना iPad Pro हे टॅब्लेट्स पुरविण्याकरिता येणाऱ्या रु.२६,९९,६०,४००/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी राज्यातील न्यायिक अधिका-यांना Apple iPad Pro हे टॅबलेट्सच्या वार्षिक देखभाल करारासाठी **रु.२,१७,७२,४१६/-** इतक्या रक्कमेच्या प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले आहेत. संदर्भ क्र. ३ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १४.०२.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार राज्यातील न्यायिक अधिका-यांना Apple iPad Pro हे टॅबलेट्सच्या वार्षिक देखभाल कराराच्या (comprehensive Annual Maintenance Contract) प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील न्यायिक अधिका-यांना Apple iPad Pro हे टॅबलेट्सच्या वार्षिक देखभाल करारासाठी रु.२,१७,७२,४१६/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तरा लक्ष बाहत्तर हजार चारशे सोळा फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे रु.२,१७,७२,४१६/- इतका निधी महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (जे ०००२) यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. Apple iPad Pro हे टॅबलेट्सच्या वार्षिक देखभाल बाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| Particular | Quantity | Rate per unit for two years | Total Amount for two years |
|---|---|---|---|
| Apple iPad Pro (१२.९ inches (२५६ GB - WiFi model) | २४०० | Rs.७,६८८/- (Rs.३,८४४/- for one year) | Rs.१,८४,५१,२००/- |
| GST@१८% | | | ३३,२१,२१६/- |
| Total Amount (including taxes) for two years | | | **Rs.२,१७,७२,४१६/-** |

१.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २८ नियम क्र. ७६ मधील अ व ब या अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

६. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात त्वरीत महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करावे.

७. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१५५९२०६५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2024.03.14 16:27:44 +05'30'

( नंदकिशोर ल. मोरे )
विधि सल्लागार-नि-सह सचिव.

प्रति,

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प,उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,

८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

९. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

१०. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

११. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२. निवड नस्ती/का. ७